**दहीहंडी उत्सव व प्रो-गोविंदा लीग दरम्यान मानवी मनोरे रचताना दुर्घटनाग्रस्त झालेल्या गोविंदांना विमा संरक्षण देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण ३०२३/प्र.क्र.११३/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ ऑगस्ट , २०२३.

<u>वाचा</u>:-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. विकाक २८१५/प्र.क्र.८/क्रीयुसे-१ दि.११ ऑगस्ट, २०१५.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.विकाक २८१५/प्र.क्र.८/क्रीयुसे-१ दि.२४ ऑगस्ट, २०१६.
३) शासन परिपत्रक, महिला व बालविकास विभाग, क्र.पीआयएल २०१६/प्र.क्र.५५/का-०३ दि.२४ ऑगस्ट, २०१६.
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण ३०२२/प्र.क्र.१२६/क्रीयुसे-१ दि.१८ ऑगस्ट, २०२२.
५) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्र.वैशिवि-२०२२/प्र.क्र.१६७/प्रशा-२, दि.१९ ऑगस्ट, २०२२.
६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१९८/आरोग्य-३, दि. १९ ऑगस्ट, २०२२.
७) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीयुसे/दहिहंडी/प्रो-गोविंदा /२०२३/का.०६/२५१४, दि.११ ऑगस्ट, २०२३.

<u>प्रस्तावना</u>:-

दहिहंडी उत्सवामध्ये मानवी मनोरे रचून दहिहंडी फोडण्याच्या आयोजनाबाबत मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या जनहित याचिका क्र.५६/२०१४ प्रकरणी मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालय यांच्या अनुक्रमे दिनांक ११.०८.२०१४ व दिनांक १७.०८.२०१६ रोजीच्या आदेशांच्या अनुषंगाने दहिहंडी उत्सवादरम्यान गोविंदांच्या मानवी मनोरे रचण्याच्या प्रकारास संदर्भ क्र.१ येथील दिनांक ११.०८.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये साहसी खेळाचा दर्जा देण्याबाबत व गोविंदा उत्सवाच्या आयोजनाच्या वेळी सुरक्षिततेच्या दृष्टीने करावयाच्या उपाययोजनांसंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तसेच, संदर्भ क्र.२ येथील दिनांक २४.०८.२०१६ च्या शासन निर्णयान्वये मानवी मनोरे उभारण्याच्या खेळ प्रकारास साहसी क्रीडा प्रकाराचा दर्जा देण्याच्या तसेच या क्रीडा प्रकाराबाबत राज्य संघटनेमार्फत विस्तृत नियमावली तयार करण्यासंबंधीचे निर्देश देण्यात आले आहेत. तसेच, संदर्भ क्र.५ व ६ येथील

शासन निर्णयान्वये दहिहंडी उत्सवादरम्यान अपघातग्रस्त झालेल्या गोविंदांना शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व शासकीय/निमशासकीय रुग्णालयांमध्ये मोफत उपचार करण्याबाबत सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

या पार्श्वभूमीवर गतवर्षी म्हणजे सन २०२२ मध्ये झालेल्या दहीहंडी उत्सवापूर्वी मा.मुख्यमंत्री महोदयांनी गोविंदांना विमा संरक्षण देण्याची घोषणा केली होती. तथापि, त्यावेळी दहीहंडी उत्सव अत्यंत नजीक असल्याने व कमी कालावधीत विमा उतरवण्याची प्रक्रिया पूर्ण करणे शक्य नसल्यामुळे अपघातग्रस्त गोविंदांसाठी त्यावर्षी मुख्यमंत्री सहायता निधीतून आर्थिक सहाय्य करण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला. तथापि, सदर शासन निर्णय केवळ त्याच वर्षापूरता लागू असल्यामुळे सन २०२३ या चालू आर्थिक वर्षामध्ये येणाऱ्या दहीहंडी उत्सवाच्या अनुषंगाने दहिहंडी उत्सवामध्ये सहभागी होणाऱ्या गोविंदाचा विमा उतरवणे व प्रो- गोविंदा लीग स्पर्धेचे आयोजन करणेबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २५ जुलै २०२३ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. त्यानंतर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्यासोबत दहीहंडी समन्वय समितीच्या पदाधिकाऱ्यांची दिनांक ११ ऑगस्ट,२०२३ रोजी ऑनलाईन बैठक पार पडली. या दोन्ही बैठकांमधील चर्चा, निर्देश व सूचना व संदर्भ क्र.७ येथील क्रीडा व युवक सेवा संचालनालयाचा प्रस्ताव विचारात घेऊन तसेच दहीहंडी उत्सवातील गोविंदांच्या सुरक्षेबाबत मा.न्यायालयाने वेळोवेळी दिलेले आदेश व त्याअनुषंगाने शासनाच्या विविध प्रशासकीय विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश विचारात घेऊन, सन २०२३ मधील दहीहंडी उत्सवाच्या पार्श्वभूमीवर राज्यातील ५०,००० गोविंदांना विमा संरक्षण देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय**:-

दहिहंडी उत्सव / प्रो-गोविंदा लीग मधील सहभागी गोविंदांना मानवी मनोरे रचताना अपघात/दुर्घटना होण्याची शक्यता असते. काही वेळा गोविंदा पथकातील गोविंदांचा दुर्दैवी अपघाती मृत्यू घडून येतो किंवा गंभीर दुखापत होऊन जीवाला धोका निर्माण होतो. परिणामी अपघातग्रस्त गोविंदांना व त्यांच्या कुटूंबियांना आर्थिक विवंचनेला सामोरे जावे लागते. या अनुषंगाने गोविंदांना विमा संरक्षण देण्यासाठी ओरिएन्टल इन्शुरन्स विमा कंपनीच्या माध्यमातून ५०,००० गोविंदांना प्रति गोविंदा रु. ७५/- चा विमाहप्ता याप्रमाणे एकूण रु.३७,५०,०००/- (अक्षरी रुपये सदतीस लक्ष, पन्नास हजार फक्त) इतका निधी संबंधित विमा कंपनीस अदा करण्यासाठी दहिहंडी समन्वय समिती (महा.) या संस्थेस वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेंतर्गत विमा संरक्षणाचे स्वरुप खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र | विवरण | विमा संरक्षण |
|---|---|---|
| १ | अपघाती मृत्यू | रु.१०,००,००० (रु.दहा लक्ष) |
| २ | दोन अवयव किंवा दोन डोळे गमावल्यास | रु.१०,००,०००(रु.दहा लक्ष) |
| ३ | एक हात, एक पाय किंवा एक डोळा गमावल्यास | रु.५,००,०००(रु.पाच लक्ष) |

| | | |
|---|---|---|
| ४ | कायमस्वरुपी पूर्ण अपंगत्व(Permanent total disablement) | रु.१०,००,००० (रु.दहा लक्ष ) |
| ५ | कायम अपूर्ण/पक्षपाती अपंगत्व(Permanent partial disablement) | विमा पॉलिसीमध्ये नमूद करण्यात आलेल्या टक्केवारी नुसार |
| ६ | अपघातामुळे रुग्णालयीन खर्च | प्रत्यक्षात झालेला खर्च किंवा जास्तीत जास्त रु.१,००,०००/- (एक लक्ष) |

३) सदर विमा संरक्षण योजनेसंबंधीच्या अटी, शर्ती व अन्य तरतुदी सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे राहतील. सदर अटी/शर्तींबरोबरच संबंधित विमा कंपनीने विहित केलेल्या अटी/शर्ती लागू राहतील.

५) विमा संरक्षणाचा कालावधी हा सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ते दिनांक ८ सप्टेंबर २०२३ रोजी सायंकाळी ६.०० वाजेपर्यंत राहील.

६) यावरील खर्च राज्य क्रीडा विकास निधीतून भागविण्यात येईल.

७) वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रक्कम / निधी "दहिहंडी समन्वय समिती (महा.)" या संस्थेस प्रदान करण्यात यावी.

८) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८१८१६३०२९५३२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING
ANANDRAO
DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.08.18 16:34:13 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव,
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/ विधानपरिषद)
७. सर्व सन्मा. विधान परिषद /विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहायक
९. अपर मुख्य सचिव, वित्त /गृह /सार्वजनिक आरोग्य यांचे स्वीय सहायक

१०.सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
११.पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा)-१ /२ महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
१३.सर्व विभागीय आयुक्त,
१४.सर्व जिल्हाधिकारी,
१५.सर्व पोलिस आयुक्त / पोलिस अधिक्षक
१६.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७.सर्व आयुक्त, महानगरपालिका,
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९.सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपंचायती,
२०.संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
२१.सर्व अधिष्ठाता, सर्व शासकीय वैद्यकीय/दंत विद्यालये व रुग्णालये,
२२.सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे,
२३.सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा,
२४.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा,
२५.सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद,
२६.सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालये,
२७.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२९.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी मंत्रालय, मुंबई
३१.व्यवस्थापक, ओरिएंटल इन्श्युरन्स कंपनी, ओरिएंटल हाऊस, चर्चगेट, मुंबई-४०००२०.
३२.अध्यक्ष/सचिव, दहिहंडी समन्वय समिती (महा.), मुंबई (रजि.क्र.एफ-७२१८१)
३३.निवड नस्ती (क्रीयुसे-१)

(शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकीर्ण-३०२३/प्र.क्र.११३/क्रीयुसे-१,दि.-१८.०८.२०२३ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट-अ

**दहीहंडी उत्सव/ प्रोगोविंदा लीग-मध्ये मानवी मनोरे तयार करतांना दुर्घटनाग्रस्त झालेल्या गोविंदांना विमा सरंक्षण देण्यासंदर्भातील अटी व शर्ती:-**

(१) महाराष्ट्र राज्यात आयोजित करण्यात येणाऱ्या दहीहंडी उत्सव/प्रो-गोविंदा लीगमध्ये मानवी मनोरे रचण्यासाठी प्रत्यक्ष सहभागी असलेल्या अपघातग्रस्त गोविंदांना सदर विमा सरंक्षण अनुज्ञेय राहील. याकरिता दहीहंडी समन्वय समितीकडून सराव व प्रशिक्षण असणाऱ्या, वयाची अट पुर्ण करणाऱ्या व प्रत्यक्षात भाग घेणाऱ्या गोविंदाची माहिती तपासून व प्रमाणित करून विमा कंपनीस देणे आवश्यक राहील.

(२) गोविंदांच्या विमा संरक्षणाचा कालावधी हा सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ते दिनांक ८ सप्टेंबर, २०२३ रोजी सायंकाळी ६.०० वाजेपर्यंत राहील.

(३) दहीहंडी उत्सव/प्रो-गोविंदा लीगचे आयोजन करणाऱ्या आयोजक संस्थेने, सदर आयोजनाकरीता स्थानिक प्रशासनाच्या तसेच अन्य विहित प्राधिकारी यांच्या आवश्यक परवानग्या घेणे बंधनकारक राहील.

(४) दहीहंडी उत्सव व त्यामध्ये मानवी मनोरे रचण्याबाबत आयोजकांनी मा.न्यायालय, शासन, स्थानिक प्रशासन, पोलिस यंत्रणा इ.कडून वेळोवेळी देण्यात आलेल्या/येणाऱ्या सूचनांचे/आदेशांचे पालन करणे आयोजक संस्था तसेच सहभागी गोविंदा पथकांना/संस्थांना बंधनकारक राहील.

(५) दहिहंडी उत्सव/प्रो-गोविंदा लीगचे आयोजन करणाऱ्या संस्थेने, सहभागी गोविंदांच्या सुरक्षेविषयी आवश्यक सर्व प्रकारच्या उपाययोजना केलेल्या असाव्यात.

(६) दहीहंडी उत्सवादरम्यान/प्रो-गोविंदा लीगमध्ये मानवी मनोरे रचण्यासाठी सहभागी झालेल्या गोविंदांना अपघात होऊन अशा गोविंदांचा मृत्यू/दुखापत झाल्यास, त्यांना सदर विमा संरक्षण अनुज्ञेय राहील. त्या व्यतिरिक्त अन्य कारणांमुळे अपघात / दुर्घटना झाल्यास सदर विमा सरंक्षण अनुज्ञेय असणार नाही.

(७) दहीहंडी उत्सवामध्ये सहभागी होणाऱ्या गोविंदांबाबत मा.न्यायालयाच्या आदेशानुसार विहीत केल्यानुसार गोविंदांच्या किमान वयोमर्यादेच्या अटीचे पालन करणे बंधनकारक राहील.

(८) दहीहंडी उत्सवामध्ये मानवी मनोरे रचतांना अपघात झाल्यास गोविंदांना तात्काळ वैद्यकीय मदत देण्याबाबत आयोजकांनी स्थानिक प्रशासनाच्या सहाय्याने आवश्यक ती कार्यवाही करावी.

(९) दहीहंडी उत्सवामध्ये मानवी मनोरे रचतांना झालेल्या अपघाताबाबत आयोजकांनी तात्काळ स्थानिक प्रशासन तसेच संबंधित पोलिस यंत्रणा व दहिहंडी समन्वय समिती (महा.) यांचेकडे अहवाल सादर करणे आवश्यक राहील.

(१०) मानवी मनोरे रचण्याच्या प्रकारास (खेळास) साहसी खेळाचा दर्जा देण्यात आलेला आहे. त्यामुळे ज्याप्रमाणे एकविध खेळांच्या संघटनांनी विविध स्तरावर स्पर्धा आयोजित करणे व नियमावली करणे व त्या नियमावलीनुसार स्पर्धेचे आयोजन करणे अभिप्रेत आहे. त्याप्रमाणे दहिहंडी उत्सव व प्रो-गोविंदा लीग स्पर्धा आयोजनाकरीता विविध स्तरावर या साहसी खेळांच्या संघटना स्थापित करणे व त्याव्दारे या साहसी खेळाचे नियम व अटी,स्पर्धापद्धती व उपक्रम याबाबत आयोजनाचे संदर्भात विस्तृत व स्वयंस्पष्ट नियमावली तयार करणे आवश्यक आहे.

(११) शासनामार्फत विविध क्रीडा संघटनांना स्पर्धा आयोजनाकरीता नियमानुसार निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. दहिहंडी उत्सव/प्रो-गोविंदा लीगचे आयोजन करण्यासंदर्भात क्रीडा विभागाकडे तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध नसल्याने या स्पर्धांचे आयोजन सद्य:स्थितीत दहिहंडी समन्वय समिती (महा.) यांच्या माध्यमातून करण्यात यावे.

-------------